मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई कार्यालयाच्या आवारातील महिला प्रसाधन गृहाच्या दुरुस्ती / नूतनीकरण खर्चास मंजुरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्र.एमसीटी-०८०४/१०३८/प्र.क्र.१२४/परि-५,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक : १८ ऑगस्ट, २००५

पहा : मोटार अपघात दावा न्यायाधिकरण यांची पत्रे -

१) जा.क्र.मोअदान्या/आस्था/४००/२००४, दि.२८.७.२००४

२) जा.क्र.मोअदान्या/आस्था/१५/२००५, दि.२.६.२००५

३) क्र.मोअदान्या/आस्था/२६/२००५, दि.३०.६.२००५

**शासन निर्णय** :- मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई या कार्यालयाच्या आवारात असलेल्या महिला प्रसाधन गृहाच्या दुरुस्ती / नूतनीकरण खर्चास कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी खर्चाचे अंदाजपत्रक दिलेले आहे. सदर खर्चाच्या अनुषंगाने मोटार अपघात दावा न्यायाधिकरण आवारातील महिला प्रसाधनगृहाच्या दुरुस्ती / नूतनीकरण करण्यासाठी येणाऱ्या रु.१,५०,०००/- (रुपये एक लाख पन्नास हजार फक्त) इतक्या खर्चास शासन मंजुरी देत आहे.

२. सदर खर्च मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई, मागणी क्रमांक बी-३, २०४१ - वाहनावरील कर ८०० - इतर खर्च, ८०० (००) (०१), मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, ०५ - कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली सन २००५-०६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४६२/व्यय-८, दि.८.८.२००५ अन्वये तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( रमेश शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, विकास विभाग इमारत, तिसरा मजला, सार्वजनिक बांधकाम विभाग, जुने जकात घर आवार, मुंबई ४०० ०२३
वित्त विभाग (व्यय-८), मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (परिवहन-५)